राज्यातील कृषी विद्यापीठांतर्गत निम्नश्रेणी
पदविका/ प्रमाणपत्र शैक्षणिक
अभ्यासक्रमांचा विस्तार करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय, क्र.कृषिवि १२९८/सीआर २३७/२० अे
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २६ एप्रिल २०००

वाचा :- शासन निर्णय, कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
१) क्रमांक एजीयु-१२८७/सीआर-२४०/२०-अे दि.३ मार्च, १९८९
२) क्रमांक-कृषीवि-१२९८/सीआर-२३७/२०-अे, दि. ३० जून, १९९९

शासन निर्णय :

उपरोक्त दि. ३० जून, १९९९ च्या शासन निर्णयातील आदेशामध्ये अंशत बदल करुन या प्रकरणी शासन असे आदेश देत आहे की, राज्यातील चारही कृषी विद्यापीठांतर्गत खाजगी संस्थामार्फत विना अनुदान तत्वावर कृषी व संलग्न विषयातील निम्नश्रेणी पदविका/प्रमाणपत्र अभ्यासक्रमासाठी प्रत्येक जिल्हयात दोनपेक्षा जास्त संस्थांना मान्यता देण्याचे संदर्भात संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रस्तावांची कृषी विद्यापीठ स्तरावरच सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या निकष आणि मार्गदर्शक तत्वानुसार छाननी करुन सदर प्रस्तावांना कृषी विद्यापीठाची मान्यता मिळाल्यानंतर त्याकरिता संलग्नता देण्याबाबत कृषी विद्यापीठांनी उचित कार्यवाही करावी, असे प्रस्ताव मान्यतेसाठी शासनाकडे पाठविण्याची आवश्यकता नाही. सदर मार्गदर्शक तत्वे/निकषामध्ये गरजेनुसार बदल करण्याबाबत महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, कृषी विद्यापीठाच्या सल्लासमन्वयाने आणि शासनाच्या कृषी विभागाच्या मान्यतेने आवश्यक कार्यवाही करील.

२. या प्रकरणी महाराष्ट्र कृषी विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषी विद्यापीठ परिनियम १९९० आणि महाराष्ट्र कृषी विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतुदी, तसेच शासन/महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद/ कृषी विद्यापीठाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचा/कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

३. उपरोक्त निम्नश्रेणी अभ्यासक्रम विना अनुदान तत्वावर कार्यान्वित करावयाचे असल्याने यानिमित्त संबंधित संस्था/अभ्यासक्रमासाठी शासन/कृषी विद्यापीठामार्फत कोणतेही अर्थसहाय्य/अनुदान मंजूर

200201231517510000-0400

करण्यात येणार नाही. तसेच यानिमित्त अपेक्षित असलेल्या वाढीव कार्यभाराची गरज महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद/ कृषी विद्यापीठाने त्यांच्या उपलब्ध मनुष्यबळ/साधन सामुग्रीतून भागवावी. याकरिता महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद/ कृषी विद्यापीठांना वाढीव अर्थसहाय्य/सहाय्यक अनुदान मंजूर करण्यात येणार नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
(रा. तु. जाधव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग

प्रति,

मा.मुख्यमंत्री/मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा.कुलपतींचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई ३५.
सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे ५
कुलगुरु, महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर
कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला.
कुलगुरु, मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
कुलगुरु, कोकण कृषी विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी
आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई
आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, फलोत्पादन, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, तांत्रिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त, पशुसंवर्धन,महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल-१, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२, (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर
शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कार्यासन अधिकारी, कृषी व पदुम विभाग
संग्रह धारिका

परिशिष्ट-अ

सन २०००-२००१ च्या शैक्षणिक वर्षापासून राज्यातील ४ कृषि विद्यापीठाअंतर्गत निम्नश्रेणी शैक्षणिक पदविका/ प्रमाणपत्र अभ्यासक्रम खाजगी संस्थामार्फत विनाअनुदान तत्वावर सुरु करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे/निकष.

---------------

१) इच्छुक संस्था ज्या कृषि विद्यापीठाच्या कार्यकक्षेत येत असेल त्या कृषि विद्यापीठाकडे अभ्यासक्रमासाठी मान्यता मिळविण्याकरिता अर्ज/प्रस्ताव सादर करील.

२) विनाअनुदानित कृषि पदविका आणि पदविका अभ्यासक्रमाकरिता.

सन २०००-२००१ च्या शैक्षणिक वर्षापासून खालीलप्रमाणे शुल्क आकारण्यात यावे. सदर शुल्कापैकी १० टक्के रक्कम महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेकडे वर्ग करण्यात यावी.

| अ.क्र. | बाब | कृषि पदविका/पदविका अभ्यासक्रम |
|---|---|---|
| १ | प्रोसेसिंग फी | रुपये १०,०००/- |
| २ | डिपॉझिट | रुपये १,००,०००/- |
| ३ | बँक गॅरंटी | रुपये १,००,०००/- |

३) कृषि विद्यापीठाअंतर्गत स्थानिक चौकशी समिती संबंधित संस्थेला भेट देवून संस्थेची तपासणी करील. ज्या अभ्यासक्रमाची मान्यता मिळविण्यासाठी अर्ज केला आहे त्या अभ्यासक्रमासाठी संस्थामध्ये आवश्यक सोयी सुविधा उपलब्ध आहेत किंवा नाही याची सदर समिती पडताळणी करील.

४) उपरोक्त समिती आपला अहवाल विद्यापीठाच्या कुलगुरुंना सादर करुन सदर अहवाल इतर विद्यापीठाची अकॅडेमीक कमिटी आणि कार्यकारी परिषदेच्या मान्यतेयने विहित मार्गदर्शक तत्वे/निकषानुसार मान्य करता येईल.

५) वरीलप्रमाणे मान्य झालेल्या अहवाल/प्रस्तावाबाबत काही त्रूटी आढळल्यास किंवा त्याबाबत काही तक्रारी असल्यास मा.अध्यक्ष, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद हे महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ मधील कलम ३१ मधील तरतूदीप्रमाणे पर्यवेक्षक करुन त्यासंबंधीचा अंतिम निर्णय देतील.

६) कृषि पदविका, दुग्धव्यवसाय व पशुसंवर्धन इ. पदविका अभ्यासक्रमांसाठी प्रतिवर्षी ६० विद्यार्थी आणि प्रमाणपत्र अभ्यासक्रमासाठी प्रतिवर्षी ४० विद्यार्थी प्रवेश क्षमता राहील. प्रवेश क्षमता वाढविण्यासंबंधीचा प्रस्ताव विद्यापीठाकडे सादर झाल्यास सदर प्रस्ताव विद्यापीठ स्तरावरील समितीच्या अवलोकनासाठी पाठवून तो समाधानकारक असल्यास संबंधित विद्यापीठाचे कुलगुरु विद्यापीठाच्या विद्या शाखेमार्फत आणि कार्यकारी परिषदेमार्फत मान्यता घेवून महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधसन परिषदेला पाठवील आणि कृषी परिषद त्यांच्या शिफारशीसह यासंबंधीचा प्रस्ताव शासनाला मान्यतेसाठी सादर करील.

७) कृषी विद्यापीठाच्या स्थानिक चौकशी समितीच्या अहवालाबाबत वैधानिक समितीच्या बैठकीत चर्चा होवून संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रारंभी २ वर्षासाठी पदविका अभ्यासक्रम आणि १ वर्षाकरिता प्रमाणपत्र अभ्यासक्रमासाठी विद्यापीठमार्फत मान्यता/संलग्नता देण्यात येईल.

८) मान्यताप्राप्तीच्या सुरुवातीच्या काळात विद्यापीठाची समिती संस्थेच्या पदविका किंवा प्रमाणपत्र अभ्यासक्रमांच्या प्रगतीवर देखरेख करील. विहित नियमानुसार सदर समितीचा प्रवासभत्ता व दैनंदिन भत्याचा खर्च संस्थेला करावा लागेल.

९) सन २०००-२००१ च्या शैक्षणिक वर्षापासून प्रत्येक विद्यार्थ्यांसाठी प्रतिवर्षी रुपये ७५००/- प्रमाणे शुल्क आकारण्यात येईल. विहित केलेल्या शुल्कापेक्षा जास्त शुल्क, आकारता येणार नाही.

१०) एकुण प्रवेश क्षमतेच्या १५ टक्के जागा "व्यवस्थापन कोटा" म्हणून राखीव कोटा ठेवण्यात येईल व तो प्रवेश क्षमतेच्या मर्यादेत असेल. व्यवस्थापन कोटयामधील प्रती वर्षी शुल्क वर अनु.क्र.९ मध्ये नमूद केलेल्या शुल्काच्या ५ पटीपर्यंत राहील. व्यवस्थापन कोटा सर्वांना सारखा १५ टक्के न देता तो त्या संस्थेत घेण्यात येणाऱ्या अभ्यासक्रमाच्या दर्जानुसार वाढविण्यात येईल. "अ" दर्जासाठी १५ टक्के,"ब" दर्जासाठी १२ टक्के, "क" दर्जासाठी ८ टक्के ,"ड"दर्जासाठी ५ टक्के अशा प्रकारे व्यवस्थापन कोटा असावा. संस्थेचा/अभ्यासक्रमाचा दर्जा त्या त्या संस्थेतील /अभ्यासक्रमातील सोयी सुविधेला मार्क देवून विद्यापीठ स्तरावर याबाबतची पध्दत ठरविण्यात यावी.

११. कोणत्याही प्रकारची कॅपिटेशन फी, देणगी किंवा इतर रक्कम स्वीकारता येणार नाही. ... व्यवस्थापन कोटयातील जागा अंतर्भूत आहेत.

१२. कोणत्याही प्रकारचे न्यायालयीन खटले / प्रकरणे, प्रवेशाबाबत किंवा इतर बाबतीत, संबधित संस्था हाताळील.अशा प्रकरणी कृषी विद्यापीठ / कृषि परिषद / शासन जबाबदार राहणार नाही.

१३. संबधित संस्थेकडून विहीत नियम / आदेशांचे आणि मार्गदर्शक तत्वे / निकषांचे उल्लंघन होत असल्याचे निदर्शनास आल्यास संस्थेची मान्यता रद्द करण्याचा किंवा संस्था रद्द करण्याचा अधिकार कृषि विद्यापीठास राहील. या संदर्भात सदर संस्था पूर्णपणे जबाबदार राहील. विद्यापीठाच्या अंतिम आदेशाला दिलेल्या आव्हानाचा ( अपील ) विचार केला जाणार नाही.

१४. संस्थेमध्ये / अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांची आणि त्यामधील उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांच्या रोजगाराची आणि / किंवा उच्च शिक्षणाच्या अर्हतेबाबतची जबाबदारी शासन / कृषि विद्यापीठावर राहणार नाही.

१५. संस्थेची मान्यता चालू ठेवावी किंवा कसे हे खालील बाबींवर अवलंबून असेल. "पदविका अथवा प्रमाणपत्र मिळाल्या पश्चात संस्थेने विद्यार्थ्यांशी संपर्क साधून संस्थेमधून अभ्यासक्रम पूर्ण केलेल्या किमान ९० टक्के विद्यार्थी स्वयंरोजगारात किंवा योग्य त्या व्यवसायाची निवड करतील याची दक्षता घेणे"

१६. मुलभूत सोयी सुविधा असणेबाबत संस्थेने काटेकोरपणे पालन केले पाहिजे.

१७. विद्यापीठाने मान्यता दिल्याखेरीज संस्था दुसरा कोणताही अभ्यासक्रम सुरु करणार नाही.

१८. सन २०००-२००१ च्या शैक्षणिक वर्षापासून प्रत्येक जिल्हयात लोकसंख्येच्या प्रमाणात विनाअनुदान तत्वावर कृषी पदविका आणि पदविका अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता देण्यात यावी. मान्यता देताना ग्रामीण लोकसंख्या विचारात घेण्यात यावी. संबधित जिल्हयातील महापालिका क्षेत्रातील लोकसंख्या वगळून उर्वरीत लोकसंख्या विचारात घेऊन प्रत्येकी ३ लाख लोकसंख्येमागे १ कृषि पदविका / पदविका अभ्यासक्रम सुरु करण्यास मान्यता दयावी. असे कृषि पदविका / प्रमाणपत्र / पदविका अभ्यासक्रम जिल्हयामध्ये कोठे स्थापन करावयाचे याबाबत विद्यापीठाने तालुका निहाय /सर्कल निहाय माहिती घेऊन अभ्यासक्रम मान्य करावे. याकरिता एक समूह

2002012315175100-0400

( cluster ) तयार करावे. ज्या समुहामध्ये अगोदरच पदविका / प्रमाणपत्र अभ्यासक्रम शासकीय अगर विनाअनुदान तत्वावर सुरु असतील अशा समुहामध्ये लोकसंख्या प्रमाणकानुसार जास्त मागणी असल्यास सदर अभ्यासक्रम देण्याचा विचार करु नये. कृषि पदविका / पदविका अभ्यासक्रमाचे नियमित पर्यवेक्षण करण्यात यावे. त्याकरिता संबधित खाजगी संस्थेकडून शुल्क घ्यावे. कृषि पदविका / पदविका अभ्यासक्रमाचे ग्रेडेशन ( दर्जा ) निश्चित करावा. "क" आणि "क " च्या दर्जा खालील कृषि पदविका / पदविका अभ्यासक्रमांना मान्यता नाकारावी. दर्जा ठरविताना साधनसामुग्री आणि उपलब्ध सोयी सुविधा विचारात घेण्यात याव्यात. या संदर्भात प्रत्येक ३ वर्षाने आढावा घेऊन त्यानुसार संबधित कृषि पदविका / पदविका अभ्यासक्रम चालू ठेवावे किंवा कसे आणि सदर अभ्यासक्रम अमान्य करावे किंवा कसे याबाबत निर्णय घेण्यात यावा.

१९. कृषि शाळा / पदविका अभ्यासक्रमाचा शैक्षणिक दर्जा उच्चतम राखण्याच्या दृष्टीने कृषि विद्यापीठअंतर्गत संशोधन / महाविद्यालयाचे प्राध्यापकाचा उपयोग करावा. त्यासाठी त्यांना योग्य ते मानधन दयावे. प्राध्यापकानी वर्षातून एकदा अचानक व एकदा वेळ ठरवून भेट देऊन संनियत्रंण करावे. भेटीनंतर काही त्रुटी आढळून आल्यास त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी एक वर्षाचा कालावधी दयावा. याचे संनियंत्रण सहयोगी अधिष्ठाता ( निम्न शिक्षण ) यांनी करावे.

२०. दोन वर्षाचा कृषि शाळेचा अभ्यासक्रम पूर्ण केल्यानंतर संबधित संस्थांनी कृषिवर आधारित उद्योगाशी संपर्क / समन्वय साधुन इच्छुक विद्यार्थ्यांना सहा महिन्यासाठी अशा कृषी उद्योगाकडे प्रशिक्षणार्थी म्हणून पाठवुन, त्यांनी प्रशिक्षण कार्यक्रम पूर्ण केल्यानंतर संबधित विद्यार्थ्याला सदर कृषी उद्योगाने प्रशिक्षणार्थीने प्रशिक्षण कालावधी समाधानकारक पूर्ण केला आहे असे प्रमाणित केल्यानंतर कृषि विद्यापीठामार्फत विहित प्रमाणपत्र देण्यात यावे.

२१. या संदर्भात महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३ आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९० लेखा संहिता १९९१ तसेच शासन/महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद / कृषि विद्यापीठाने वेळोवेळी.निर्गमित केलेल्या आदेशांचा/कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.